सावंतवाडी जिल्हा कारागृह येथील बरॅक क्र. ११ ते १६ ची दुरुस्तीसाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीएलडी २००४/प्र.क्र.१६/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-३२, दि. १६ मार्च, २००४

पहा :- कारागृह महानिरिक्षक , महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी-१९१०/६७०/८१५/कक्ष-३, दि. २९.१.२००४.

<u>शासन निर्णय</u> :- सावंतवाडी जिल्हा कारागृहातील बरॅक क्रमांक ११ ते १६ ची दुरुस्ती करण्यासाठी उप विभागीय अभियंता, सर्वजनिक बांधकाम विभाग क्र. १, सावंतवाडी यांनी स्वाक्षांकित केलेले रु. २,००,०००/- इतक्या रकमेच्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उक्त दि. २९.१.२००४ पत्रान्वये शासनास सादर केले असून सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

२. सावंतवाडी जिल्हा कारागृहाचे बांधकाम सुमारे ११० वर्षापूर्वीचे असून ते फार जुने आहे. या बरॅकीची सतत पडझड होत असल्याने त्याची वारंवार दुरुस्ती करावी लागते सध्या या कारागृहातील बरॅक क्र. ११ ते १६ चे छप्पर, कौले खराब झालेली असून बरॅकीमध्ये अन्य किरकोळ दुरुस्तीची आवश्यकता असल्यामुळे तेथे बंदी ठेवता येत नाहीत. त्यामुळे सदर दुरुस्तीसाठी आवश्यक असलेल्या रु. २,००,०००/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य यांनी शासनास पाठविला आहे. सदर वस्तुस्थितीत केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनांवर दि. ९ जानेवारी, २००४ रोजी प्रधान सचिव (तुरुंग) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत सावंतवाडी जिल्हा कारागृहातील बॅरॅक क्र. ११ ते १६ ची दुरुस्तीसाठी मान्यता दिली असून सदर दुरुस्तीसाठी येणारा खर्च रु. २,००,०००/- (दोन लाख फक्त) इतक्या रकमेचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या सन २००२-०३ च्या सुधारीत आराखड्यात केलेले असून विभागाने सन २००३-२००४ च्या आर्थिक वर्षात मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८९)" या लेखाशिर्षाखाली आर्थिक तरतूद केलेली आहे.

३. उपरोक्त वस्तुस्थिती, कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व त्यामुळे बंद्याच्या सोयीसुविधेत होणारी वाढ या बाबी लक्षात घेता सावंतवाडी जिल्हा कारागृहातील बॅरॅक ११ ते १६ ची दुरुस्ती करण्यासाठी येणारा खर्च रुपये २,००,०००/- (रुपये दोन लाख

फक्त) तसेच अंदाजपत्रक व नकाशास शासन या शासननिर्णयाद्वारे प्रशासकीय मंजुरी देत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०९८९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २००३-२००४ च्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व खर्चाची माहिती केंद्रशासनास पाठविण्यासाठी विहित विवरणपत्रात भरुन शासनास सादर करावी.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर १७८/०४/व्यय-८, दि. ०३.०३.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई
- अधिक्षक, सावंतवाडी जिल्हा कारागृह, जि. सिंधुदूर्ग
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
- उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र-१, सावंतवाडी.
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.